**नागरी स्थानिक संस्थांच्या विविध देय रक्कमांचा भरणा करण्यासाठी रु. १००० व रू.५०० मुल्यांच्या जुन्या नोटांचा वापर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः- संकिर्ण-२०१६/प्र.क्र.४४१/नवि-२०,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
**दिनांकः- १० नोव्हेंबर, २०१६.**

<u>वाचा</u>:- वित्त विभागाचे पत्र क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.६४/कोशा प्रशा-५, दि. १०.११.२०१६

<u>शासन परिपत्रक:-</u>

केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाने अधिसूचना क्रमांकः- S.O.3407 (E), दि. ०८.११.२०१६ च्या अधिसूचनेन्वये दि. ०८.११.२०१६ च्या मध्यरात्रीपासून रू.१००० व रू.५०० मुल्यांच्या नोटा व्यवहारातून रद्द करण्यात आल्या आहेत. दरम्यान वित्त विभागाच्या उपरोक्त दि. १०.११.२०१६ च्या पत्रान्वये केंद्र शासनाशी विचारविनिमय करून पुढीलप्रमाणे सूचना देण्यात आल्या आहेत.

"To avoid inconvenience to the public, Old High Denomination Bank notes may also be accepted by Government, State Owned Enterprises and Local bodies (Urban and Rural) until the midnight of 11$^{th}$ Nov 2016. However, the amount so accepted would be restricted to raised demand only. The amount may be accepted only from the concerned individual/ individual entity against whom the dues exist. A third party may also deposit the dues subject to an authorization given by the individual/individual entity against whom the dues exist. In such cases, the tenderer will also be required to submit valid proof of identity."

तसेच या अनुषंगाने संबंधीत प्रशासकीय विभागांनी आवश्यक त्या सूचना निर्गमित कराव्यात असे निदेश वित्त विभागाने दिले आहेत.

२. महानगरपालिका/नगरपालिकांच्या विविध करांचा भरणा/ थकबाकी भरण्यासाठी नागरीकांनी रोखीने जुन्या चलनात रक्कमा भरण्याची तयारी दर्शविली आहे. सदर चलनाव्दारे देय करांची / थकबाकीची रक्कम नागरीकांकडून जुन्या चलनात स्विकारावी किंवा कसे? याबाबत शासनाकडे विचारणा होत होती. वित्त विभागाच्या उपरोक्त दि. १०.११.२०१६ च्या पत्रातील सूचना विचारात घेऊन केंद्र शासनाने रद्द केलेल्या रू.१००० व रू.५०० मुल्यांच्या नोटा महानगरपालिका / नागपूर सुधार प्रन्यास / पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण / बेस्ट / नगरपरिषदा / नगरपंचायतींच्या विविध करांचा भरणा / थकबाकी भरण्यासाठी स्विकारण्यास पुढील अटी व शर्तींच्या अधिन राहून अनुमती देण्यात येत आहे:-

१) मालमत्ता कर, पाणीपट्टी इत्यादी करांची वसूली करण्याबाबतची मागणी दि. ०८.११.२०१६ पूर्वी केलेली असावी.

२) भरणा करून घ्यावयाच्या संबंधीत कराची रक्कम ही उपरोक्त मागणी केलेल्या रक्कमेच्या मर्यादेत असावी. सदर रक्कम विवादीत (Disputed) नसावी, तसेच कोणत्याही परिस्थितीत प्रतिसाक्षित (under protest ) रक्कमेचा भरणा करून घेण्यात येऊ नये.

३) अशा पध्दतीने जमा करून घेण्यात येणारी करांची रक्कम ही ना परतावा योग्य (Non Refundable) असेल ही बाब नागरीकांच्या निदर्शनास आणून देण्यात यावी.

४) उपरोक्त रक्कम ज्याच्या नावाने कराच्या वसूलीबाबत मागणी करण्यात आली आहे, त्या व्यक्तिने स्वत: अथवा त्या व्यक्तिने प्राधिकृत केलेल्या व्यक्तीस भरणा करता येईल. मात्र सदर त्रयस्थ पक्षाने रक्कमेचा भरणा करताना स्वत:च्या ओळखीचा वैध पुरावा तसेच प्राधिकार पत्र (Authorization Letter)सादर करणे आवश्यक राहिल.

५) जुन्या चलनातील नोटांच्या स्वरूपातील कर भरणा हा **शुक्रवार दि. ११.११.२०१६ रोजी मध्यरात्री पर्यंतच** अनुज्ञेय असेल.

३. तरी सर्व महानगरपालिका आयुक्त, सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण व सर्व नगरपरिषद/नगरपंचायत मुख्याधिकारी यांनी यास व्यापक प्रसिध्दी द्यावी. तसेच वर नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहून नागरीकांना देय रक्कमांचा भरणा करता येणे शक्य व्हावे म्हणून आवश्यक ती सर्व प्रशासकीय व्यवस्था करावी. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून नागरिकांना नागरी स्थानिक संस्थांच्या देय रक्कमांचा भरणा करता येणे शक्य व्हावे म्हणून सर्व संबंधित प्राधिकाऱ्यांनी यासाठी शुक्रवार दि. ११.११.२०१६ रोजी मध्यरात्रीपर्यंत कार्यालये सुरु ठेवावित, त्यासाठी आळीपाळीने अधिकारी / कर्मचारी यांच्या नियुक्त्या करण्यात याव्यात.

४. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१६१११०१७१९०७५०२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2016.11.10 17:28:00 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्माननीय विधानसभा/ विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
७) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
८) राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
९) महाव्यवस्थापक, बेस्ट, मुंबई
१०) सर्व विभागीय आयुक्त
११) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१२) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
१३) राज्यातील सर्व जिल्हाधिकारी
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, पिंपरी-चिंचवड, पुणे
१५) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगरपंचायत (सर्व)
१६) निवडनस्ती